तात्काळ/कालमर्यादा

राज्यातील फरार बंदी/फरार आरोपी यांना फेर अटक करण्यासाठी सर्व पोलीस ठाण्यामध्ये पोलीस अधिकारी व कर्मचारी असा एक विशेष कक्ष स्थापनेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

शासन परिपत्रक क्र. सीआरटी ४०३/प्र.क्र. ३६४/पोल-११,
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दि. २२ /१०/२०१०

## परिपत्रक

फरार आरोपी व फरार बंदी यांना फेर अटक करण्याच्या अनुषंगाने मा. उच्च न्यायालयात दाखल झालेल्या याचिकेच्या अनुषंगाने मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशास अनुसरुन शासन असे आदेश देत आहे की, सर्व पोलीस घटक प्रमुखांनी आपआपल्या अधिपत्याखाली कार्यरत असलेल्या प्रत्येक पोलीस स्टेशनमध्ये एक विशेष कक्ष तत्काळ स्थापन करावा. फरार बंदी व आरोपीची संख्या जेथे जास्त असेल तेथे एका पेक्षा जास्त कक्ष उघडण्यात यावेत. अशा प्रकारे स्थापन केलेल्या विशेष कक्षात एक अधिकारी व इतर गरजेप्रमाणे पोलीस कर्मचारी वर्ग नेमण्यात यावा. सदर कक्षातील पोलीस अधिकारी व पोलीस कर्मचारी यांनी त्यांचे पोलीस स्टेशनच्या हद्दीतील फरार बंदी /फरार आरोपी यांची सर्व माहिती संकलीत ठेवावी व त्यातील फरार आरोपी व फरार बंदी यांना अटक करण्याची कशोसीने मोहिम हाती घ्यावी.

२. सर्व पोलीस घटक प्रमुखांनी अशा प्रकारे प्रत्येक पोलीस स्टेशनमध्ये निर्माण केलेल्या विशेष पथकास कोणत्याही परिस्थितीत दुसऱ्या कोणत्याही कामासाठी नेमणुक केली जाणार नाही याची खबरदारी घ्यावी. तसेच, पोलीस घटक प्रमुखकांनी या कक्षाची कामगिरी प्रत्येक आठवडयास आढावा घेऊन प्रगतीवर स्वतः लक्ष ठेवावे.

३. सदर विशेष पोलीस कक्षातील पोलीस अधिकारी व कर्मचारी यांचेवर त्यांचे कार्यकक्षेतील सर्व फरारी बंदी/फरारी आरोपी यांना फेरअटक करण्याची जबाबदारी राहील याची जाणीव करुन दयावी. कर्तव्यात कसूर करणाऱ्या पोलीस अधिकारी व कर्मचारी यांचेवर जबाबदारी निश्चित करुन कारवाई करण्यात येईल याचीही त्यांना समज देण्यात यावी.

४. सदर आदेशाची अंमलबजावणी तत्काळ करुन सर्व पोलीस घटक प्रमुखांनी शासनास पूर्तता अहवाल १० नोव्हेंबर पूर्वी सादर करावा. पूर्तता न कळवणाऱ्या घटक प्रमुखांची माहिती व त्यांच्यावर करण्यात येणाऱ्या कारवाईची माहिती दिनांक २३/११/२०१० रोजी मा.उच्च न्यायालय यांना देण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( नं.म.शिंदे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन,

प्रति,
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव,
अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहाय्यक,
प्रधान सचिव (विशष) गृह यांचे स्वीय सहाय्यक,
मा. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,
अपर पोलीस महासंचालक, (गुन्हा अन्वेषण विभाग), पुणे,
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व पोलीस महानिरीक्षक, (परिक्षेत्र)
सर्व पोलीस जिल्हा प्रमुख,

---------